**"मुख्यमंत्री सौर कृषि वाहिनी योजना-२.०" अंतर्गत वीज उपकेंद्र देखभाल आणि दुरूस्तीसाठी रु.४८१.९७ कोटी इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करणेबाबत. (मागणी क्र.के-६ लेखाशीर्ष क्र.२८१००१२३)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: बीयुडी-२०२४/प्र.क्र.२८/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०४ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१६/प्र.क्र.३५४/ऊर्जा-७, दिनांक १४.०६.२०१७.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१८/प्र.क्र.२६/ऊर्जा-७, दिनांक १७.०३.२०१८.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०२३/प्र.क्र.९५/ऊर्जा-७, दिनांक ०८.०५.२०२३.
४. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.२८/ऊर्जा-७, दिनांक २६.०३.२०२४.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४.
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४.
७. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, व कामगार विभाग, क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१४५/ऊर्जा-७, दिनांक १३.०९.२०२४.
८. महावितरण कंपनीचे पत्र क्र.का.सं.(सं.व.सु)/नियोजन/एमएसकेव्हीवाय २.०/३४७९५, दिनांक ०७.११.२०२४.

**प्रस्तावना:**

शेतकऱ्यांच्या शेतीपंपांना दिवसा वीज पुरवठा करण्यासाठी कृषी फिडर्सचे सौर ऊर्जीकरण मिशन मोडमध्ये करण्याच्या दृष्टीने "मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० शेतकऱ्यांच्या शेतीपंपांना दिवसा अखंडीत व शाश्वत वीज पुरवठा करण्याचे अभियान" संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आले आहे. सदर अभियानातंर्गत राज्यात ७००० मेगावॅट क्षमतेची सौर ऊर्जा प्रकल्प निर्माण करण्यात येणार आहे. तद्नंतर, संदर्भाधिन क्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये मिशन मोड २०२५ च्या सौर ऊर्जा निर्मिती क्षमतेचे उद्दिष्ट वाढवून ९००० मेगावॅट अधिक उर्वरित ७००० मेगावॅट असे एकूण १६००० मेगावॅट विकेंद्रीत सौर ऊर्जा क्षमता निर्मितीचे उद्दिष्टास मान्यता देण्यात आली आहे. सदर अभियानातंर्गत आस्थापित होणाऱ्या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी वीज उपकेंद्राच्या आवश्यक देखभाल व सुधारणांसाठी उदा.ब्रेकर्सची दुरूस्ती/बदलणे, संरक्षण प्रणाली दुरूस्ती किंवा बदल, उपकेंद्रातील सर्किट बदल, ट्रान्सफॉर्मरची क्षमता वाढविणे, कॅपॅसिटर बदल इत्यादींसाठी राज्य शासनाद्वारे प्रति उपकेंद्र रु.२५ लाखापर्यंत अनुदान महावितरण/महापारेषण कंपनीस शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार आहे. त्यानुसार, महावितरण कंपनीतर्फे कृषी वीज वाहिनीचे सौर उर्जीकरण वेगाने करण्यासाठी एकूण २७८२ वीज उपकेंद्रांमध्ये विद्युत पायाभूत सुविधा उभारणीची तांत्रिक कामे हाती घेण्यात आली आहेत. सदर कामांसाठी एकूण रु.६९५.५० कोटी इतक्या निधीची आवश्यकता आहे. त्यापैकी, सन २०२३-२४ मध्ये रु.४०.०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस संदर्भाधिन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात आला आहे. आता, महावितरण कंपनीने त्यांच्या संदर्भाधिन क्र.८ येथील पत्रान्वये, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उर्वरित रु.६५५.५० कोटी इतका निधी उपलब्ध करून

देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सन २०२४-२५ करीता मागणी क्र.के-६ लेखाशीर्ष क्र.२८१००१२३ खाली रु.८४९.०० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. त्यानुषंगाने, मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० अभियानातंर्गत वीज उपकेंद्रांच्या आवश्यक देखभाल आणि सुधारणांसाठी रु.४८१.९७ कोटी इतका निधी सन २०२४-२५ करीता मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

"मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.०" अभियानातंर्गत वीज उपकेंद्रांच्या आवश्यक देखभाल आणि सुधारणांसाठी रु.४८१.९७ कोटी (रुपये चारशे एक्क्याऐंशी कोटी सत्त्यानऊ लाख फक्त) इतका निधी अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई यांना वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री.कराड, सह सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्रीम.अंकिता बोऱ्हाडे, कार्यासन अधिकारी, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई (Chairman and Managing Director, Maharashtra State Electricity Distribution Company Ltd) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० अंतर्गतच्या घटकांसाठी करण्यात येणाऱ्या खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महावितरण कंपनीने शासनास सादर करावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी केवळ वीज उपकेंद्राच्या देखभाल व दुरूस्तीसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल, याची खातरजमा करण्यात यावी. सदर निधीचा विनियोग करताना संदर्भाधिन क्र.३ व ६ येथील शासन निर्णयातील सूचनांचे काटेकोर पालन करावे. विहित कालावधीत सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महावितरण कंपनीकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदारी निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहायक/उप संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांवर टाकण्यात यावी.

५. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

६. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, (००)(०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीमधून भागविलेला खर्च (कार्यक्रम), ५०, इतर खर्च (२८१००१२३)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा. या लेखाशीर्षाखाली निधी

वितरीत करण्यासाठी सादर करण्यात येणाऱ्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, सदर देयक सशर्त असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच, उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही.

७. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी महावितरण कंपनी यांना निधी वितरीत करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ मधील आवश्यक त्या सूचना व अटींचे पालन करून तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ मधील तरतूदींनुसार व नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३७१/का.१४६१, दिनांक ११.१२.२०२४ आणि वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२९/२०२५/व्यय-१६, दिनांक ०३.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०४१८२७५०३५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2025.03.04 18:29:21 +05'30'

**(प्रदिप भिंताडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.सभापती/मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
३. मा.उप सभापती/मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
४. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास व गृहनिर्माण), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई,
८. मा.मंत्री (अपारंपरिक ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई,
१२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
१७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९. सचिव, मा.महाराष्ट्र वीज नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
२०. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या.,मुंबई,

२२. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२३. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२४. सर्व विभागीय आयुक्त,
२५. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२६. सर्व जिल्हाधिकारी,
२७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
२८. सह सचिव (ऊर्जा-७/३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२९. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
३०. निवड नस्ती/ऊर्जा-७.